**केंद्र सहाय्यित राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत पशुधन विमा योजना या कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ मधील अखर्चित निधी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून वितरण करणेबाबत.**
**केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०३डी६६९) ४० टक्के**
**राज्य हिस्सा(लेखाशिर्ष २४०३डी६७८) ३० टक्के**
**केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०३डी६२२) ५० टक्के**
**राज्य हिस्सा(लेखाशिर्ष २४०३डी६३१) ३० टक्के**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२२/प्र.क्र.२/अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १२ जानेवारी,२०२२

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१
४) कृषि व पदुम विभाग नस्ती क्र.बीडीएस-२०२१/प्र.क्र.१११/पदुम-४,

**शासन निर्णय :-**

केंद्र सहाय्यित राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत पशुधन विमा योजना या कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०३डी६६९) ४० टक्के मध्ये रु. ४०.०० लाख,राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०३डी६७८) ३० टक्के मध्ये रु. ३०.०० लाख तसेच केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०३डी६२२) ५० टक्के मध्ये रु.८.३३ लाख, राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०३डी६३१) ३० टक्के तध्ये रु. ५.०० लाख याप्रमाणे निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

त्या अनुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १,२ व ३ येथील परिपत्रकान्वये कार्यक्रम खर्चाकरीता निधी वितरणाच्या मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. केंद्र सहाय्यित राष्ट्रीय पशुधन अभियानातंर्गत पशुधन विमा योजना या कार्यक्रमातंर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील अखर्चित निधी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पित निधीतून खर्च करण्यासाठी केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०३डी६६९) (गोंदिया गडचिरोली व चंद्रपूर जिल्हा वगळून) ४० टक्के मध्ये रु. ४०.०० लाख, राज्य हिस्सा राज्य हिस्सा(लेखाशिर्ष २४०३डी६७८) (गोंदिया गडचिरोली व चंद्रपूर जिल्हा वगळून) ३० टक्के मध्ये रु. ३०.०० लाख ,केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०३डी६२२)(गोंदिया गडचिरोली व चंद्रपूर जिल्हयांसाठी) ५० टक्के मध्ये रु. ८.३३ लाख, तसेच व राज्य हिस्सा(लेखाशिर्ष २४०३डी६३१) (गोंदिया गडचिरोली व चंद्रपूर जिल्हयांसाठी) ३० टक्के मध्ये रु. ५.०० लाख असा एकूण केंद्र हिस्सा रु ४८.३३ लाख व राज्य हिस्सा रु ३५.०० लाख एवढा निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, पदुम विभाग यांना केंद्र सहाय्यित राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत पशुधन विमा योजना या कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जाती घटकांसाठी अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.६.४.२०२१, दि. २४.६.२०२१ व दि. १४.१०.२०२१ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.६.४.२०२१, दि. २४.६.२०२१ व दि. १४.१०.२०२१ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १०१४/व्यय-१४, दि.१६.११.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०११२१७०४०२७५२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2022.01.12 17:04:47 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सचिव, कृषी व पदुमण विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग